सहायक सेवाप्रवेशोत्तर प्रशिक्षण परीक्षा २०१५
साठी अर्ज पाठविणेबाबत.

# महाराष्ट्र शासन

## सामान्य प्रशासन विभाग

## शासन परिपत्रक क्रमांकः सेप्रप२०१५/प्र.क्र.१०/का.१७

मादाम कामा मार्ग, हुतात्मा राजगुरु चौक,
मंत्रालय, मुंबई ४०० ०३२
दिनांक: २९ जून, २०१५

वाचा

**१) शासन परिपत्रक क्रमांकः सेप्रप२०१५/प्र.क्र.१०/का.१७, दि.२६ मे, २०१५**

## शासन परिपत्रक

मंत्रालयीन प्रशासकीय विभागातील आणि महाराष्ट्र लोकसेवा आयोगाच्या कार्यालयातील सहायकांची सेवाप्रवेशोत्तर प्रशिक्षण परीक्षा २०१५ च्या अनुषंगाने प्रशिक्षण घेऊन परीक्षेस बसू इच्छिणाऱ्या उमेदवारांची नावे प्रशासकीय विभागाकडून प्राप्त झाली असून, त्यांचे प्रशिक्षण संदर्भाधिन परिपत्रकानुसार सुरु आहे.

२. सहायक सेवाप्रवेशोत्तर प्रशिक्षणास प्रवेश देण्यात आलेल्या उमेदवारांव्यतिरिक्त प्रशासकीय विभागातील ज्या सहायकांनी यापूर्वी सेवाप्रवेशोत्तर प्रशिक्षण परीक्षेला बसून सर्व विषयात अनुत्तीर्ण झाले आहेत, काही विषयात अनुत्तीर्ण झाले आहेत किंवा विहित अर्ज भरुन परीक्षेला अनुपस्थित राहीले होते अशा सहायकांचे विहित नमुन्यातील अर्ज (संबंधित उमेदवाराचे पूर्ण नाव, सहायक पदावरील नियमित नियुक्ती दिनांक, यापूर्वी परीक्षेला बसलेले वर्ष, आसन क्रमांक, सूट मिळाली असल्यास त्याबाबतचा तपशिल नमूद करुन ) प्रशासकीय विभागांच्या आस्थापना अधिकाऱ्यांनी अर्जातील तपशील बरोबर असल्याचे प्रमाणित करुन या विभागाकडे निश्चितपणे दिनांक २४ जुलै, २०१५ पर्यंत पोच होतील अशा पध्दतीने पाठवावेत.

तसेच दि. २६ मे, २०१५ च्या परिपत्रकानुसार सुरु झालेल्या प्रशिक्षणासाठी ज्या पात्र सहायकांचे अर्ज विहित मुदतीत सामान्य प्रशासन विभागाला प्राप्त झालेले नाहीत, परंतु ज्या पात्र सहायकांना सन २०१५ च्या सहायक सेवाप्रवेशोत्तर प्रशिक्षण परीक्षेस प्रथमच बसावयाचे आहे त्यांचे विहित नमुन्यातील अर्ज सुध्दा अचूक तपशिलासह (पूर्ण नाव, सहायक पदावरील नियमित नियुक्ती दिनांक) या विभागास दि. २४ जुलै, २०१५ पर्यंत पाठवावेत.

३. सहायक पदावर नियमित नियुक्त झालेले उमेदवारच फक्त सदर परीक्षेला बसू शकतात. या संदर्भात काही त्रुटी राहील्यास, त्याची संपूर्ण जबाबदारी संबंधित प्रशासकीय विभागाच्या आस्थापना अधिकाऱ्यांची राहील याची कृपया नोंद घ्यावी.

४. सर्व मंत्रालयीन विभागांना विनंती करण्यात येते की, त्यांनी सदरहू परिपत्रक तातडीने सर्व संबंधित सहायकांच्या (प्रतिनियुक्तीवर / रजेवर असलेल्या सहायकांसह) निदर्शनास आणावे व त्यांची स्वाक्षरी घेवून ती कागदपत्रे आपल्या अभिलेखात जतन करुन ठेवावीत.

५. सदर शासन परिपत्रक महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या संकेतस्थळावर उपलब्ध करण्यात आले असून त्याचा संकेताक २०१५०६२९१५००१५०६०७ असा आहे. हा आदेश डिजीटल स्वाक्षरीने साक्षांकित करुन काढण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावाने.

ASHOK DHONDIBA BHAWAR

Digitally signed by ASHOK DHONDIBA BHAWAR
DN: c=IN, o=Government of Maharashtra, ou=General Administration Dept, postalCode=400032, st=Maharashtra, cn=ASHOK DHONDIBA BHAWAR
Date: 2015.06.29 15:04:58 +05'30'

**(अ.धों.भवार)**
कार्यासन अधिकारी, महाराष्ट्र शासन

**प्रत,**

१. सचिव, महाराष्ट्र लोकसेवा आयोग, मुंबई (पत्राने)
२. सर्व मंत्रालयीन विभाग (आस्थापना)
३. निवडनस्ती.